**सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ई निविदा प्रक्रियेअंतर्गत निविदा प्रसिध्दी, निविदा लिफाफे उघडणे आणि निविदा तपासणी व स्विकृती याबाबत एकत्रित सुधारित सूचना**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक (२): सीएटी/२०१७/प्र क्र ०८ /इमा-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २७ जुलै २०१७

वाचा : (१) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्रमांक : सीएटी/२०१७/प्र क्र ०८ /इमा-२ दिनांक १२ एप्रिल, २०१७
(२) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन शुध्दीपत्रक, क्रमांक : सीएटी/२०१७/प्र क्र ०८ /इमा-२ दिनांक २९ जून, २०१७

**शासन शुध्दीपत्रक**

प्रस्तावना:-

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ई निविदा प्रक्रियेअंतर्गत निविदा प्रसिध्दी, निविदा लिफाफे उघडणे आणि निविदा तपासणी व स्विकृती याबाबत एकत्रित सुधारित सूचना यापूर्वी शासन निर्णय, क्रमांक : सीएटी/२०१७/प्र क्र ०८ /इमा-२ दिनांक १२ एप्रिल, २०१७ तसेच शासन शुध्दीपत्रक, क्रमांक : सीएटी/२०१७/प्र क्र ०८ /इमा-२ दिनांक २९ जून, २०१७ अन्वये निर्गमित केल्या आहेत.

२ ) यासंदर्भात कंत्राटदार संघटनांची निवेदने व प्रचलित पध्दती तसेच केंद्र शासनाकडून प्राप्त झालेली विविध मार्गदशक परिपत्रके यांचा अभ्यास करून खालील सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

२) सदर शासन शुध्दीपत्रकातील परि.क्र.२ मध्ये ई-निविदा प्रसिद्धीच्या कालावधीमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत :-

| अ.क्र. | कामाची किंमत | प्रथम वेळ | द्वितीय वेळ | तृतीय वेळ |
|---|---|---|---|---|
| १. | रु.१०० कोटी आणि त्यावरील फिडीक / ब-२ पद्धत | ४५ दिवस* | ३० दिवस* | ३० दिवस* |

**(* शासकीय सुट्टीचे दिवस वगळता प्रत्यक्ष कामकाजाचे दिवस)**

३) सदर शासन शुध्दीपत्रकातील परिच्छेद क्र.५ मध्ये ई-निविदा पोर्टलवर "बीड लॉक" झाल्यानंतर निविदांबाबत "हार्ड कॉपी" एका प्रतीत कंत्राटदारांनी त्याच दिवशी सादर करणे अनिवार्य करण्यात आले आहे. तथापि ई-निविदा पोर्टलवर "बीड लॉक" झाल्यानंतर निविदांबाबत "हार्ड कॉपी" एका प्रतीत कंत्राटदारांनी निविदा सादर करावयाच्या वेळेपासून ७२ तासात सादर करणे अनिवार्य आहे. त्यानुसार लिफाफा क्र.१ उघडण्याचा दिनांक निविदा सूचनेत नमूद करण्यात यावा. ई निविदा प्रक्रियेमध्ये काही अडचण निर्माण झाल्यासच सदर निविदा (हार्ड कॉपी) उघडण्यात यावी, अशा सूचना निर्गमित केल्या आहेत.

या संदर्भात ई-निविदा पोर्टलवर "बीड लॉक" झाल्यानंतर निविदांबाबत "हार्ड कॉपी" ची एक प्रत कंत्राटदारांनी निविदा सादर करावयाच्या वेळेपासून ७२ तासात खालीलपैकी कोणत्याही एका ठिकाणी सादर करणे अनिवार्य आहे.

१. संबंधीत कार्यकारी अभियंता यांचे कार्यालय
२. मुख्य अभियंता यांनी नामनिर्देशित केलेल्या संलग्न कार्यकारी अभियंता यांचे कार्यालय
३. संबंधीत अधीक्षक अभियंता यांचे कार्यालय
४. संबंधीत मुख्य अभियंता यांचे कार्यालय
५. संबंधीत उप सचिव, सा.बां. विभाग, मंत्रालय, मुंबई

उपरोक्त बदल / सुधारणा व्यतिरिक्त संदर्भीय शासन निर्णयातील अन्य सूचना कायम राहतील.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या सेकत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१७०७२७१७२७०३६२१८ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sachin M Chivate

Digitally signed by Sachin M Chivate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=P W D, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6e7b26851b8dfa36d6a3064f810d85d8a1472436e83e5056505816231cebe9fa, cn=Sachin M Chivate
Date: 2017.07.27 17:34:09 +05'30'

**( सचिन चिवटे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
२. मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
६. सार्वजनिक बांधकाम विभाग/वित्त विभाग/ग्राम विकास विभाग
७. महालेखापाल-१, मुंबई
८. महालेखापाल-२, नागपूर
९. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई/नागपूर
१०. प्रत, महासंचालक, माहिती व प्रसिध्दी महासंचालनालय, मुंबई यांना प्रसिध्दीसाठी
११. प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी,
१२. सर्व मुख्य अभियंते, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, (विद्युतसह)
१३. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ , सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
१४. संचालक, उद्याने व उपवने, मुंबई
१५. सर्व अधीक्षक अभियंते, सार्वजनिक बांधकाम विभाग, (विद्युत / यांत्रिकी)
१६. अधीक्षक अभियंता यांनी आपल्या अधिनस्त विभागातील कार्यालयांना सदर शासन निर्णयाची प्रत अग्रेषित करावी.
१७. मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता, पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई
१८. सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, सा.बां.वि.,मंत्रालय, मुंबई
१९. कार्यासन इमारती-२ (निवड नस्ती)